महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) या संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब या संवर्गात पदोन्नतीबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक: आकृवि-२४२३/प्र.क्र.२०१/१५अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: १८ जून, २०२४.

**संदर्भ**:- १)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब,दि.७/५/२०२१
२) सामान्य प्रशासन विभागाची दि.१४/७/२०२१ रोजीची अधिसूचना.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) या संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब या संवर्गात तात्पुरत्या पदोन्नतीसाठी या विभागामार्फत तयार करण्यात आलेल्या सन २०२३-२४ च्या निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाने सहमती दिली आहे. सदर सहमतीस अनुसरुन, खालील नमूद अधिकाऱ्यांना महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) (वेतनश्रेणी एस-१५ : रु.४१८०० - १३२३००) संवर्गातून सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (वेतनश्रेणी एस-१६ : रु.४४९०० - १४२४००) या संवर्गात निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने खालीलप्रमाणे पदस्थापना देण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | गट-ब (कनिष्ठ) ज्ये.क्र. | निवड सूची क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | विभागीय संवर्ग वाटप नियमावली नुसार मिळालेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | ५०५ | ६८ | श्री.विकास उत्तम सोनावणे | अ.जा. | नागपूर | जिल्हा कृषि अधिकारी (विघयो), जिल्हा परिषद, भंडारा. (रिक्त पदी) |
| २ | ५०६ | ६९ | श्री.दिपक एकनाथ कांबळे | अ.जा. | नागपूर | तंत्र अधिकारी, उपविभागीय कृषि अधिकारी, उमरेड, जि.नागपूर. (रिक्त पदी) |
| ३ | ५०७ | ७० | श्री.नयन नंदकुमार मगर | भज-ब | नागपूर | तंत्र अधिकारी, उपविभागीय कृषि अधिकारी, काटोल, जि.नागपूर (रिक्त पदी) |

| अ. क्र. | गट-ब (कनिष्ठ) ज्ये.क्र. | निवड सूची क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | विभागीय संवर्ग वाटप नियमावली नुसार मिळालेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ५०८ | ७१ | श्री.धिरज मधुकर तोरणे | अ.जा. | कोकण-२ | तालुका कृषि अधिकारी, महाड, जि.रायगड (रिक्त पदी) |
| ५ | ५०९ | ७२ | श्रीमती सुषमा विलास मोरे | खुला | नागपूर | जिल्हा कृषि अधिकारी (सामान्य), जिल्हा परिषद, नागपूर (रिक्त पदी) |
| ६ | ५१० | ७३ | श्री.विशाल वसंतराव बिऱ्हाडे | अ.जा. | अमरावती | जिल्हा कृषि अधिकारी (विघयो), जिल्हा परिषद, बुलढाणा (रिक्त पदी) |
| ७ | ५११ | ७४ | श्री.वैभव हरिश्चंद्र विश्वे | अ.जा. | अमरावती | तालुका कृषि अधिकारी, बुलढाणा, जि.बुलढाणा (रिक्त पदी) |
| ८ | ५१२ | ७५ | श्रीमती सविता मुकुंद भिंगारदे | खुला | नागपूर | जिल्हा बीज प्रमाणीकरण अधिकारी, वर्धा (रिक्त पदी) |
| ९ | ५१३ | ७६ | श्री.सागर राहुल कांबळे | अ.जा. | नागपूर | तंत्र अधिकारी, जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, नागपूर (रिक्त पदी) |
| १० | ७२९ | ७७ | श्री.गुलाब काशिनाथ कडलग | खुला | पुणे | तंत्र अधिकारी (शेतकरी मासिक), विस्तार व प्रशिक्षण-६, कृषि आयुक्तालय, पुणे. (रिक्त पदी) |
| ११ | ८२७ | ७८ | श्री.नितीन श्रीकिसनराव लोखंडे | खुला | अमरावती | तंत्र अधिकारी, उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला (रिक्त पदी) |

२. उपरोक्त तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

**(अ)** सदर तात्पुरती पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व

प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधीन राहून आणि सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.७/५/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त असलेल्या पदांवर ज्येष्ठतेने देण्यात येत आहेत.

**(ब)** सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्यामुळे या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

**(क)** सदरचे पद हे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतील असल्याने सदर पदोन्नती/निवडसूची लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित करण्यात येईल.

**(ड)** संबंधित अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब पदावरील तात्पुरती पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२/९/२०१६, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/का.१२, दि.१/८/२०१९ मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांचे नाव सन २०२३-२४ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि पुढील दोन वर्षी (सन २०२४-२५ व २०२५-२६) होणाऱ्या निवडसूचीमध्ये त्यांचा नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत (सन २०२६-२७) महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

**(इ)** सदर अधिकाऱ्यांची महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**(ई)** उपरोक्त अधिकाऱ्यांनी त्यांचा सध्याचा पदाचा पदभार विभागातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे. तसेच पुढील बाबही निदर्शनास आणण्यात येते की, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन अधिसूचना दि.२१/६/२०२१ मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात पदोन्नतीच्या पदावर रूजू होणे आवश्यक आहे.

३. वरील अधिकाऱ्यांची परस्पर सेवाज्येष्ठता सामान्य प्रशासन विभागाने सन २०२३-२४ च्या निवडसूचीला दिलेल्या मान्यतेनुसार राहील.

४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१८१५५११०१६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL NILAKANTH SAKHARKAR

Digitally signed by AMOL NILAKANTH SAKHARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=36b60751d094e56d974e1a44ec234c475fb0de5b35a79c1cf69a588f212b260e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BB4888CEBBF4B7A6440C6531A52925E3C8140B1C28DF723D8F006D11BC169A08, cn=AMOL NILAKANTH SAKHARKAR
Date: 2024.06.18 16:07:44 +05'30'

**( अ.नि.साखरकर )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा)१/२ महाराष्ट्र मुंबई /नागपूर.

६) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

७) सर्व कृषि संचालक, व्दारा आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.

८) सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

९) सर्व कृषि सहसंचालक/सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१०) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (द्वारा-आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे)

११) संबंधित अधिकारी, व्दारा आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१२) निवडनस्ती १५ अे.